महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन परिपत्रक क्रमांक - संकीर्ण १०११/प्र.क्र. १७३ /सेवा-९
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२. दि. २५ ऑक्टोबर, २०११.

## परिपत्रक

शासन अधिसुचना वित्त विभाग क्र. वेपुर १२०९/प्रक्र२७/सेवा-९ दिनांक २२ एप्रिल, २००९ अन्वये शासकीय कर्मचारी व इतर यांना दिनांक १ जानेवारी, २००६ पासून महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन ) नियम २००९ लागू करण्यात आले आहेत.

२. दि. १ जानेवारी २००६ च्या पूर्वीपासून, जे कर्मचारी असाधारण रजेवर होते किंवा निलंबनाखाली होते व प्रत्यक्षात दिनांक १ जानेवारी, २००६ नंतर असाधारण रजेवर असतानाच सेवानिवृत्त किंवा मृत्यु पावले अथवा निलंबनाखाली असताना सेवानिवृत झाले/करण्यात आले आहेत, अशा कर्मचाऱ्यांना या नियमाचा लाभ अनुज्ञेय आहे किंवा कसे तसेच दिनांक १ जानेवारी, २००६ नंतर एखाद्या कर्मचाऱ्यास मुळ वेतनावर आणण्याची शिक्षा दिल्यास संबंधित कर्मचाऱ्यास लागु असलेल्या वेतनबॅन्डमधील किमान वेतन हे मूळ वेतन समजावे की अधिसुचनेच्या जोडपत्र-३ मधील प्रारंभिक वेतन हे मूळ वेतन समजावे असे प्रश्न उपस्थित झाले आहेत.

३. शासनाने यावर विचार केला असून, शासन आता असा खुलासा करीत आहे की, जे कर्मचारी दि. १ जानेवारी २००६ पुर्वीपासून असाधारण रजेवर किंवा निलंबनाखाली होते व जे प्रत्यक्षात दि. १ जानेवारी २००६ नंतर असाधारण रजेवर असताना सेवानिवृत्त किंवा मृत्यु पावले असतील किंवा निलंबनाधीन असताना सेवानिवृत्त झाले/करण्यात आले असतील तर अशा कर्मचाऱ्यांना म.ना.से.(सु.वे.) नियम २००९ चा लाभ अनुज्ञेय नाही.

एखाद्या कर्मचाऱ्यास मुळ वेतनावर आणण्याची शिक्षा दिल्यास, सदर कर्मचारी संबंधित पदावर दि. १ जानेवारी, २००६ नंतर सरळसेवेने नियुक्त झाला असेल तर त्यास जोडपत्र ३ मधील नमूद प्रारंभिक वेतनावर आणण्यात यावे. अन्य कर्मचाऱ्यास शिक्षा म्हणून मूळ वेतनावर आणावयाचे असेल तर वेतनबॅन्डमधील किमान मूळ वेतनावर आणण्यात यावे.

४. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१११०२५११४४५७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( शि. म. म्हात्रे )
उप सचिव, वित्त विभाग

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
सर्व मंत्री व राज्यमंत्री, यांचे स्वीय सहायक
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
सर्व विभागीय आयुक्त
मंत्रालयाच्या प्रशासकीय विभागाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
* प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई
* प्रबंधक, उच्च न्यायालय, (मूळ शाखा), मुंबई
* सचिव महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
* सचिव महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र,मुंबई
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
संचालक , लेखा व कोषागारे
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशोब, मुंबई
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशोब, मुंबई/पुणे नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
लेखा अधिकारी, वेतन पडताळणी पथक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
लेखा अधिकारी,वेतन पडताळणी पथक
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व कोषागार अधिकारी
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई
वित्त विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, वित्त विभाग (सेवा-९)
* पत्रान्वये